सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजनेंतर्गत निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०२१ /प्र.क्र १३४ /एसडी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २९ मार्च, २०२२

**वाचा**

१. शासन निर्णय क्रमांक - पीआरई २०११/प्र.क्र. २४९/प्राशि-१;दिनांक ०१.१०.२०१३.
२. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
३. शिक्षण संचालक (प्राथमिक )महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.प्राशीसं /रागांविअसाअयो / २०२१-२२/अं-२०४/३२११, दिनांक २९.०९.२०२१.
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२१/प्र.क्र.१३४/एसडी-६, दिनांक १० नोव्हेंबर, २०२१
५. शिक्षण संचालक (प्राथमिक )महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.प्राशीसं /रागांविअसाअयो / २०२१-२२/अं-२०४ दिनांक ०२ मार्च, २०२२.

**प्रस्तावना -**

शालेय शिक्षण व क्रिडा विभागाच्या संदर्भ क्र. ०१ येथील दि.०१.१०.२०१३ च्या शासन निर्णयानुसार इयत्ता १ ली ते १२ वी पर्यंत शिकणाऱ्या मुला/मुलींना अपघातामुळे क्षतीची नुकसान भरपाई देण्यासाठी " राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजना" नियमित स्वरुपात राबविण्यात येत आहे. सदर शासन निर्णयान्वये विद्यार्थ्याचा अपघात झाल्यास अनुज्ञेय सानुग्रह अनुदान व यासाठी आवश्यक कागदपत्रे नमूद करण्यात आली असून याबाबतचे प्रस्ताव निकाली काढण्यासाठी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली आहे.

राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजनेंतर्गत राज्यातील अनुज्ञेय लाभार्थ्यांना अनुदान देण्यासाठी सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात रु.२.२५६५ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान या योजनेसाठी रु.१२००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित असून यापैकी रु.२.२५६५ कोटी ( रूपये दोन कोटी पंचवीस लाख पासष्ट हजार मात्र ) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्र. ०२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८०० इतर खर्च (०६) राज्यातील विद्यार्थ्यांसाठी अपघात विमा योजना (०६)(०२) राज्यातील विद्यार्थ्यांसाठी अपघात विमा योजना (२२०२ ३१०९), कार्यक्रम ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा असेल त्याच वेळी आहरीत करण्यात यावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवण्यात येऊ नये.

४. याबाबत संदर्भ क्र. ०१ येथील शासन निर्णयामधील अटी व शर्ती लागू राहतील.

५. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही तात्काळ करण्यात यावी. यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे हे नियंत्रक अधिकारी असल्याने त्यांनी सर्व आहरण व संवितरण अधिकारी असलेल्या जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक) यांना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील अटींची पूर्तता करून तरतूद वितरीत करण्याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौ.स. क्र. १३१/१४७१, दिनांक २२.०३.२०२२ व वित्त विभाग अनौ.सं. क्र.४०४/२०२२/व्यय-५,दि.२५.०३.२०२२ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२९१८४८१४५७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2022.03.29 18:49:24 +05'30'

**( टि.वा. करपते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२.मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३.मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४.मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६.मा.विरोधी पक्षनेता ( विधानपरिषद ) यांचे खाजगी सचिव, मुंबई.
७.मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा ) यांचे खाजगी सचिव, मुंबई.
८. सर्व विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
९. सर्व विधानसभा सदस्य यांचे स्वीय सहायक.
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
११. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४. शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक/ उच्च माध्यमिक),महाराष्ट्र पुणे,
१५. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,

१६. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१७.सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१९. सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक)
२०. सर्व जिल्हा कोषागारे,
२१. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
२२. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
२३. कार्यासन (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. निवड नस्ती (एसडी-६)